२०१००८१३१३४४४१००१

**नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग**

**सहायक संचालक नगर रचना, नगर रचनाकार, सहायक नगर रचनाकार या पदावरील अधिकारी यांना पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी पुरस्कृत करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक:- टीपीव्ही-२२०९/१०३९/प्र.क्र.२०९/०९/नवि-२७

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ३ फेब्रुवारी, २०१०.

**प्रस्ताविक :**

नगर रचना विभागातील तांत्रिक अधिकाऱ्यांचे कौशल्यात वाढ करुन त्याचा शासकीय कामासाठी उपयोग करुन घेणे या उद्देशाने विभागातील तांत्रिक अधिकाऱ्यांना नगर रचना विषयात पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठी शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे / विश्वेश्वरय्या राष्ट्रीय प्रौद्योगिकी संस्थान नागपूर / स्कूल ऑफ प्लॅनिंग व आर्किटेक्चर, नवी दिल्ली इत्यादी मान्यताप्राप्त संस्था येथे नगर रचना प्रशिक्षण योजनेअंतर्गत शासन पुरस्कृत उमेदवार म्हणुन पाठविण्याची योजना पूर्वीपासून अंमलात आहे. यासंदर्भात धोरणात्मक निर्णय घेण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

राज्यातील नागरीकीकरणाचे दिवसेंदिवस वाढत जाणारे प्रमाण, नगर रचना विषयात येत राहणारे नवनवीन व आधुनिक तंत्रज्ञान यामुळे या विभागातील अधिकाऱ्यांना नगर रचना विषयांतर्गत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम पूर्ण करण्याची गरज आहे. यासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

१) नगर रचना विभागांतर्गत कार्यरत असणाऱ्या सर्व सहायक संचालक, नगर रचना / नगर रचनाकार / सहायक नगर रचनाकार या पदावरील तांत्रिक अधिकाऱ्यांना त्या त्या संवर्गाच्या सेवा जेष्ठतेनुसार सदर प्रशिक्षणासाठी पुरस्कृत करण्यात येईल. सदर प्रशिक्षणासाठी पाठविण्यात येणारे अधिकारी प्रशिक्षण कालावधीत प्रतिनियुक्तीवर असल्याचे समजण्यात येईल.

२) शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे, विश्वेश्वरय्या राष्ट्रीय प्रौद्योगिकी संस्थान, नागपूर आणि स्कूल ऑफ प्लॅनिंग व आर्किटेक्चर, नवी दिल्ली इत्यादी मान्यताप्राप्त संस्थांमध्ये प्रतीवर्षी किती अधिकाऱ्यांची व कोणत्या संस्थेत प्रशिक्षणासाठी निवड करावयाची याबाबत अर्थसंकल्पीय तरतूद विचारात घेऊन संचालक, नगर रचना, पुणे यांनी निर्णय घ्यावा.

३) प्रशिक्षणासाठी निवड करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांचे वय ४५ वर्षापेक्षा जास्त नसावे.

४) बी.ई. (सिव्हील) / बी.आर्च (B.E. (Civil) / B.Arch) अर्हता धारण करणारे अधिकारी सदर योजनेअंतर्गत प्रशिक्षणासाठी पात्र ठरतील.

५) प्रशिक्षण योजनेअंतर्गत निवड करण्यात आलेल्या अधिकाऱ्याने प्रशिक्षणास जाण्यास नकार दिल्यास त्या संवर्गामध्ये प्रशिक्षणास जाण्यास इच्छुक दुसरे अधिकारी उपलब्ध असल्यास प्रथम त्यांना प्रशिक्षणास पाठविण्याची संधी देण्यात यावी. तदनंतर प्रथम नकार दिलेल्या अधिकाऱ्याचा फक्त एकदाच प्रशिक्षणासाठी पाठविण्याबाबत विचार करावा.

६) ज्या अधिकाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी अथवा न्यायालयीन खटला सुरु आहे त्या अधिकाऱ्याची प्रशिक्षणासाठी निवड करण्यात येऊ नये.

७) अभ्यासक्रमासाठी लागणारे शुल्क, स्टेशनरी इत्यादी अनुषंगिक खर्च अधिकाऱ्यांना अनुज्ञेय राहील.

८) संबंधित अधिकाऱ्यास सदर प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर [illegible] पदोन्नतीसाठी हक्क सांगता येणार नाही.

९) संबंधितांकडून आवश्यक ते बंधपत्र संचालक, नगर रचना, पुणे. प्राप्त करुन घ्यावे.

१०) प्रशिक्षण कालावधीचा वेतन व भत्ते यावरील खर्च

<u>**प्रधान लेखाशीर्ष-२२१७ नगर विकास**</u>

**००३(००)(०१)-अभियांत्रिकी पदवीधरांना नगर रचना विषयातील प्रशिक्षण (योजनांतर्गत)(२२१७०१८१)** या उपलेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

११) प्रशिक्षणासाठी पाठविण्यात आलेल्या अधिकाऱ्यांचा तपशील संचालक, नगर रचना, पुणे यांनी शासनास वेळोवेळी सादर करावा.

**महाराष्ट्राचे राज्यपाल** यांचे आदेशानुसार व नावाने.

( रा. श. जाधव )

अवर सचिव, **महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे. (दहा प्रती).

महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

कक्ष अधिकारी (नवि-२९), संगणक कक्ष, नगर विकास विभाग. (वेबसाईटवर अपलोड करण्यासाठी)

निवड नस्ती (नवि-२७)